**श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता.कामठी, जि.नागपूर या तीर्थस्थळाच्या मूळ मंजूर विकास आराखड्यात नव्याने कामांचा समावेश व या कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

महाराष्ट्र शासन
नगरविकास विभाग,
**शासन निर्णय, क्रमांक-नासुप्र-२०१७/प्र.क्र.९६/नवि-२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० ऑक्टोबर,२०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक-तीक्षेवी-२०१५/प्र.क्र.१६/१४४४ दि. २६ मे, २०१५.
२) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक-तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.०६/का-१४४४ दि. ४ जून,२०१५
३) शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्रमांक-नासुप्र-२०१५/युओआर-५८/प्र.क्र.११४/नवि-२६ दि.२१ डिसेंबर, २०१५
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.का.अ./प्र-१/८७३ दिनांक १२/१०/२०१७
५) शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्रमांक-नासुप्र-२०१७/प्र.क्र.९६/नवि-२६ दि.२३ ऑक्टोबर,२०१७ व समक्रमांक दि.२६ ऑक्टोबर,२०१७ चे शुध्दीपत्र
६) शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्रमांक-नासुप्र-२०१५/युओआर-५८/प्र.क्र.११४/नवि-२६ दि.३० ऑक्टोबर,२०१७
७) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.डेस्क-१२/एमयुएन-३/कावि-७९८/२०१८ दिनांक १३/०६/२०१८
८) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या उच्च स्तरीय समितीच्या दिनांक २०/०७/२०१८ च्या बैठकीच्या अनुषंगाने, समितीने दिनांक २३/०९/२०१८ ची केलेली शिफारस.
९) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्रमांक-.डेस्क-१२/एमयुएन-३/कावि-१३२१/२०१८ दिनांक ०१/१०/२०१८
१०) मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०३/१०/२०१८ रोजी संपन्न झालेल्या शिखर समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या “ब” वर्ग तिर्थक्षेत्र / पर्यटन स्थळाचा विकास करण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयान्वये विकास आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. यामध्ये ८० टक्के राज्य शासन व २० टक्के नागपूर सुधार प्रन्यास असा खर्चाचा वाटा आहे. त्यानंतर, उपरोक्त संदर्भाधीन क्र.०६ येथील शासन निर्णयान्वये या आराखड्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तत्पूर्वी संदर्भाधीन क्र.०५ येथील शासन निर्णयान्वये या आराखड्यामध्ये नव्याने कामांचा समावेश करण्यासाठी प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

आता या आराखड्यामध्ये आणखी नव्याने, आवश्यक कामे समाविष्ट करण्याच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, नागपूर यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्र.०७ व ०९ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला होता.

त्यावर संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये नियुक्त मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीसमोर दिनांक २०/०७/२०१८ रोजी झालेली बैठक आणि तद्नंतर या समितीने केलेल्या शिफारशीनुसार जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, नागपूर यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्र.०७ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीसमोर मान्यतेसाठी सादर केला होता.

त्यानुसार मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीने, मा.मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने केलेली शिफारस व या बैठकीत जिल्हाधिकारी, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र.०९ येथील पत्रान्वये आयत्यावेळी सादर केलेला नवीन कामाचा प्रस्ताव यावर चर्चा करुन, श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी या विकास आराखड्यात रु.३१.६८९७ कोटी इतक्या रकमेच्या (पीएमसी शुल्कासह) विकास कामांना संदर्भाधीन क्र.१० येथील इतिवृत्तान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

तद्नुसार, प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री.महालक्ष्मी जगदंबा संस्थान, कोराडी, ता.कामठी, जि.नागपूर या तीर्थस्थळाच्या मूळ विकास आराखड्यात खालीलप्रमाणे नमूद कामे आणखी नव्याने समाविष्ट करुन, त्यास या शासन निर्णयाद्वारे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम (रु.कोटीत) |
|---|---|---|
| १ | Mahadwar in Jodhpur Pink Sandstone | ०६.३०६३ |
| २ | Ram Mandir Hall in Jodhpur pink Sandstone | ०८.९९७८ |
| ३ | Hanuman Mandir Hall in Jodhpur Pink sandstone | ०६.२३४८ |
| ४ | National Higway to Koradi Trust Approach Road | ०८.१५१४ |
| ५ | Food Court | ००.५३८९ |
| ६ | Indoor Game House | ००.५३८९ |
| | Total :- | ३०.७६६७ |
| | PMC Charges ३% | ००.९२३० |
| | Grand Total:- | ३१.६८९७ |

**अटी व शर्ती :-**

१. या प्रकल्पासाठी शासकीय हिस्सा म्हणून लागणारा निधी नियोजन विभाग अतिरिक्त नियतव्यय म्हणून नगरविकास विभागाला उपलब्ध करुन देईल.
२. संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयातील आवश्यक त्या अटी व शर्ती लागू राहतील.
३. तत्पूर्वी यापूर्वीच्या मंजूर विकास आराखड्यानुसार मंजूर असलेली कामे पूर्ण झाल्यानंतर व याबाबतची निधी उपयोगिता प्रमाणपत्रे जिल्हाधिकारी, नागपूर यांनी सादर केल्यानंतर सदरचा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाही व्हावी.

४. कोराडी, ता.कामठी, जि.नागपूर या तिर्थस्थळ विकास आराखड्यात यानंतर कोणतीही अतिरिक्त कामे मंजूर करण्याचे प्रस्ताव विचारात घेतले जाणार नाहीत.

०२. या प्रकरणी अतिरिक्त नियतव्ययाद्वारे निधी उपलब्ध करुन घेण्याबाबत आणि निधी वितरीत करण्याबाबत कार्यासन नवि-१६, नगरविकास विभाग यांनी पुढील कार्यवाही करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१२४४३२४९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2018.10.10 12:51:48 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
३. मा.मंत्री, ऊर्जा नवीन व नवीकरणीय ऊर्जा तथा पालकमंत्री नागपूर यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री, नगरविकास यांचे खाजगी सचिव.
६. नागपूर जिल्ह्यातील संबंधित संसद सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद सदस्य.
७. मा.अध्यक्ष, नागपूर जिल्हा परिषद, नागपूर.
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (नवि-१), सचिव (नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
१३. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
१४. जिल्हाधिकारी नागपूर, नागपूर.
१५. पोलीस महानिरीक्षक, नागपूर/ पोलीस अधिक्षक नागपूर.
१६. अवर सचिव, कार्यासन नवि-१६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.